**आकाशवाणी नागपूर,**

**(मराठी - वेळ सायंकाळी ६.४०)**

**शनिवार, दिनांक 5 सप्टेंबर २०२०**

**ठळक बातम्या**

१. शिक्षक हेच खरे राष्ट्र निर्माते असल्याच राष्ट्रपती रामनाथ कोविन्द यांचं प्रतिपादन.
२. देशात कोरोंना विषाणूचे आतापर्यंतचे सर्वाधिक ८६ हजार ४३२ नवे रुग्ण.
३. कोरोंनामुळे ग्रस्त पोलिस कर्मचाऱ्यांवर त्वरित उपचार करण्यासाठी पोलिस दल तत्पर असल्याच गृहमंत्री अनिल देशमुख यांचं प्रतिपादन.
४. नागपुर महानगरपालिकेतर्फे 31 खाजगी रुग्णालय डेडीकेटेड कोविड हॉस्पिटल मध्ये परावर्तीत होणार.

#########

शिक्षक हेच खरे राष्ट्र निर्माते असल्याचं प्रतिपादन राष्ट्रपतीरामनाथ कोविंद यांनी केलं आहे. माजी राष्ट्रपती डॉ.सर्वपल्ली राधाकृष्णन यांची जयंतीआज शिक्षक दिन म्हणून साजरी होत आहे, त्यानिमित्त आयोजित शिक्षक पुरस्कार वितरण समारंभातते बोलत होते. त्यांच्या हस्ते ४७ शिक्षकांना यावेळी राष्ट्रीय शिक्षक पुरस्कारांचंवितरण करण्यात आलं. आपल्या परंपरेमधे गुरुचं स्थान सर्वोच्च मानलं गेलं असल्याचं राष्ट्रपतीयावेळी म्हणाले. राज्यातले दोन शिक्षक, अहमदनगर जिल्ह्यातले नारायण मंगलाराम आणि मुंबईच्यासंगीता सोहोनी यांचा पुरस्कार विजेत्यांमधे समावेश आहे. कोरोना विषाणू प्रादुर्भावाच्यापार्श्वभूमीवर राष्ट्रपतींनी दूरदृष्य संवाद प्रणालीच्या माध्यमातून यंदा या पुरस्कारांचंवितरण केलं. पंतप्रधान नरेंद्र मोदी यांनी एका संदेशाद्वारे शिक्षक दिनानिमित्तदेशभरातल्या शिक्षकांना शुभेच्छा दिल्या आहेत. शिक्षकांचे कठोर परिश्रम आणि देश घडवण्यातल्यात्यांच्या योगदानाबद्दल देश कृतज्ञ असल्याची भावना पंतप्रधानांनी व्यक्त केली आहे.शिक्षकांनी केलेल्या उल्लेखनीय प्रयत्नांबद्दल त्यांचं आपण आभार मानतो, असंही त्यांनीया संदेशात

म्हटलं आहे. नवीन शैक्षणिक धोरण देशाच्या 21 व्या शतकातील गरजांची पूर्तता करण्याच्या दिशेने कार्य करणारे आहे. 34 वर्षानंतर बदल केलेल्या शैक्षणिक धोरणामुळे विद्यार्थ्यांमध्ये वैज्ञानिक दृष्टीकोन निर्माण होऊन, संशोधन आणि विकासवृत्तीला चालना मिळेल, असे प्रतिपादन केंद्रीय माहिती व प्रसारणमंत्री प्रकाश जावडेकर यांनी केले.मुंबई येथील पार्ले टिळक विद्यालय असोसिएशनच्या शतकमहोत्सवी वर्षातील शिक्षकदिन कृतज्ञता सोहळ्याप्रसंगी "नवीन शैक्षणिक धोरण" या विषयावर ते आज बोलत होते.नवीन शैक्षणिक धोरणामुळे एकूण पटनोंदणीचे प्रमाण 10 वर्षांमध्ये दुप्पटीने वाढेल, असे प्रकाश जावडेकर यांनी सांगितले. नवीन शैक्षणिक धोरणामुळे पटनोंदणी वाढेल. सध्या 50 लाख ते 2 कोटी मुलं शाळेबाहेर आहेत. त्यांना राष्ट्रीय मुक्त विद्यालय संस्था (NIOS), खुल्या शाळांच्या माध्यमातून शिक्षण देण्यात येईल. आकडेमोड आणि लिहिणे-वाचणे याकडे लक्ष दिले जाणार. यामुळे सर्वांना शिकण्याची संधी मिळेल, अस जावडेकर यांनी यावेळी सांगितले.

########

कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचा नववा दीक्षांत समारंभ मंगळवार, 8 सप्टेंबर रोजी सकाळी 11 वाजता रामटेक येथील विद्यापीठ परिसरात आभासी माध्यमातून आयोजित केला आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल आणि विश्वविद्यालयाचे कुलपती श्री. भगतसिंग कोश्यारी हे दीक्षांत समारोहाच्या अध्यक्षस्थानी राहतील तर, प्रमुख अतिथी म्हणून योगगुरू स्वामी रामदेवजी, पतंजली योगपीठ, हरिद्वार हे उपस्थित राहणार आहेत. या दीक्षांत समारोहात 2018- 19 मध्ये उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना पदवी प्रदान करण्यात येणार आहे. कुलगुरू प्रो. श्रीनिवास वरखेडी या दीक्षांत समारोहात 271 पदव्युत्तर पदवी, 628 पदवी, 879 पदविका, 86 पदव्युत्तर पदविका, व 35 प्रमाणपत्रा अशी एकूण 1956 पदवी प्रमाणपत्र प्रदान करतील. एकूण 34 सुवर्ण पदकांसह 15 रोख पारितोषिके देखील या दीक्षांत समारोहात प्रदान करण्यात येणार आहेत. तसेच याप्रसंगी 1 (डी.लिट्) तसेच 56 विद्यार्थ्यांना विविध विद्याशाखां अंतर्गत (पीएच्.डी.) पदवीने गौरवान्वित करण्यात येईल.

########

देशात कोरोना विषाणुचे आतापर्यंतचे सर्वाधिक ८६ हजार ४३२ नवे रुग्ण आढळले आहेत. एकूण रुग्ण संख्या ४० लाख २३ हजार १७९ झाली आहे. गेल्या केवळ तेरा दिवसांमधे रुग्ण संख्या तीस लाखांवरून चाळीस लाखांवर गेली असल्याची माहिती केंद्रीय आरोग्य मंत्रालयानं दिली आहे. दरम्यान, ३१ लाख सात हजार २२३ रुग्ण या संसर्गावर उपचार घेऊन बरे झाले असून रुग्ण बरे होण्याचं प्रमाण ७७ पूर्णांक २३ शतांश टक्के पर्यंत वाढलं आहे. या संसर्गामुळे आज सकाळी आठ वाजेपर्यंतच्या चोवीस तासांमधे एक हजार ८९ रुग्णांचा मृत्यू झाला आहे. मृत्यूमुखी पडलेल्या एकूण रुग्णांची संख्या ६९ हजार ५६१ झाली आहे. मृत्यू दर एक पूर्णांक ७३ शतांश टक्क्यांपर्यंत कमी झाला असल्याची माहिती केंद्रीय आरोग्य मंत्रालयानं दिली आहे. देशात कोरोना विषाणू संसर्गासाठी कालपर्यंत चार कोटी ७७ लाख ३८ हजार ४९१ नमुने तपासण्यात आले असून यातले दहा लाख ५९ हजार ३४६ नमुने काल तपासण्यात आले आहेत. राज्यात काल 13 हजार 289 रुग्ण बरे झाल्यानं त्यांना घरी सोडलं. राज्यात आतापर्यंत 6 लाख 25 हजार 773 रुग्ण कोरोनामुक्त झाले आहेत. काल आणखी 19 हजार 218 कोरोनाबाधित रुग्णांची नोंद झाली. पहिल्यांदाच राज्यात एका दिवसातल्या रुग्णसंख्येनं 19 हजारांचा टप्पा ओलांडला आहे. त्यामुळे राज्यातली एकूण रुग्णसंख्या ८ लाख 63 हजार 62 झाली आहे. काल 378 रुग्णांचा मृत्यू झाला. राज्यात या विषाणू संसर्गानं आतापर्यंत 25 हजार 964 रुग्णांचा मृत्यू झाला आहे. सध्या राज्यात दोन लाख दहा हजार 978 रुग्णांवर उपचार सुरु आहेत.

########

विधानसभा अध्यक्ष नाना पटोले यांना कोरोनाची बाधा झाली असून काल रात्री त्यांचा अहवाल पॉजिटीव्ह आला. त्यामुळे सोमवार पासून

सुरू होणाऱ्या अदिवेशनाच्या कामकाजात ते सहभागी होऊ शकणार नाहीत. त्यामुळे उपाध्यक्ष नरहरी झिरवाळ हे अध्यक्षपद भुषवतील. पटोले यांनी त्यांच्या संपर्कात आलेल्या सर्वांना कोरोनाची चाचणी करण्याचं आवाहन केलं आहे. काही दिवसांपुर्वी अधिवेशनाच्या पार्श्वभुमिवर पटोले यांनी आरोग्य सचीव आणि अन्य अधिकाऱ्यांची बैठकही बोलावली होती. या सर्वांची देखील आज चाचणी करण्यात आली आहे.

########

कोरोणा महामारी च्या काळात गेल्या चार महिन्यात अविरत कार्य करणारे पोलीस, वैद्यकीय, निम वैद्यकीय तसेच महानगरपालिका कर्मचारी यांनी दिवस-रात्र काम केले. पोलिस कर्मचारी तर चोवीस तास कामावर होते याच काळात राज्यात जवळपास 165 कोरोनाला पोलीस बळी पडले आहे .त्याचं अतीव दुःख मला आहे. आजारी पोलिसांवर त्वरित उपचार करण्यावर पोलीस दल भर देणार आहे असे महाराष्ट्राचे गृह मंत्री अनिल देशमुख यांनी आज नागपुरात सांगितलं. नागपूरचे मावळते पोलीस आयुक्त डॉक्टर भूषणकुमार उपाध्याय यांच्या निरोप समारंभाप्रसंगी ते बोलत होते. कुख्यात गुन्हेगारांवर पोलीस कारवाई केली आहे. त्यामुळे नागपूर शहरात पोलीस अधिकाऱ्यांच्या शहरात रिक्त असलेल्या जागा लवकर भरून नवनियुक्त पोलिस आयुक्त हे झोननिहाय तक्रारीचा निपटारा करतील असा विश्वास त्यांनी व्यक्त केला. सुमारे चारशे तक्रारी ह्या लोकांमधून आपल्याकडे आलेल्या आहेत. त्यापैकी बहुतांश तक्रारी या मालमत्ता संदर्भातील आहे असे, अनिल देशमुख यांनी सांगितलं. पोलीस आयुक्त डॉक्टर भूषणकुमार उपाध्याय यांनी नागपूरातील 2 वर्ष हे आपल्या कारकिर्दमधील चांगला काळ होता या काळात नागपूरातील गुन्हेगारीवर आपण नियंत्रण प्रस्थापित केल,असे त्यांनी सांगितले. नवे आयुक्त अमितेश कुमार यांनी पोलिस दलाच्या संदर्भात कोरोना विषयक परिस्थितीचा आढावा घेऊन उपाययोजना करणार असल्याचं सांगितलं.

########

पूर्व विदर्भातील तसेच नागपूरच्या ग्रामीण भागातील पुरग्रस्त भागांचा दौरा करण्यासाठी राज्याचे मदत आणिपुनर्वसन मंत्री विजय वडेट्टीवार आज नागपूर दौऱ्यावर आले होते. यावेळी त्यांनीपूर्णतः पडलेल्या घरासाठी 95 हजार रुपयेआणि शेतीसाठी हेक्टरी 20 हजार 400 रुपये नुकसान भरपाई देणार असल्याची माहिती दिली.पूरग्रस्त परिस्थिती मुळे शेतकऱ्यांचे अतोनात नुकसान झाले असून त्यांच्या पशुधन, मत्स्यपालनशेतीच्या नुकसान संदर्भात अशा वेगवेगळया प्रकरणाचे पंचनामे होतील आणि त्याचीनुकसान भरपाई संबंधित यंत्रणेतर्फे शेतकऱ्यांना देण्यात येईल असे त्यांनीसांगितलं. दरम्यान गोंदिया जिल्यातील वाहणाऱ्या वैनगंगा नदीत तसेच बाघ नदीत पूर आल्याने भंडारा जिल्हा तसेच गोंदिया जिल्यातील तिरोडा आणि गोंदिया तालुक्यातील पूर परिस्थितीमुळे झालेल्या नुकसानाची पाहणी आज राज्यसभा सदस्य खासदार प्रफुल पटेल यांनी केली असून १५ दिवसाच्या आता महाविकास आघाडी सरकार शेतकऱ्यांना याची भरपाई देईल अशी ग्वाही पटेल यांनी दिली.

########

गडचिरोली शहरासह काही तालुक्यांमध्ये आज सकाळी तासभर मुसळधार पाऊस पडला. आठवडाभर जिल्ह्यात पाऊस न पडल्याने उकाडा जाणवत होता. मात्र, आज सकाळी मेघगर्जना आणि विजांच्या कडकडाटासह पावसाच्या जोरदार सरी बरसल्या. त्यामुळे नागरिकांना दिलासा मिळाला. शिवाय पुरामुळे शेतात दलदल निर्माण झाली होती. ती दलदल या पावसामुळे वाहून जाण्यास मदत होणार असून, धान पिकाला चांगला फायदा होणार आहे. पावसानंतर ढगाळ वातावरण असून, पुन्हा पाऊस बरसण्याची शक्यता आहे. दरम्यान विदर्भातील भंडारा, गडचिरोली, चंद्रपुर, गोंदिया, नागपुर आणि यवतमाळ येथे येत्या 48 तासात तुरळक ठिकाणी विजेच्या गडगडाटासह कळकटासह पावसाची शक्यता नागपुरच्या प्रादेशिक हवामान केंद्रान वर्तविली आहे. बुलडाणा जिल्ह्यात काल रात्रभर वादळी वाऱ्यासह पावसाने दमदार हजेरी लावली होती त्यामुळे जिल्ह्यातील बुलडाणा, खामगाव,चिखली, शेगाव, संग्रामपुर,सह

परीसरात अनेक ठिकाणी पाऊस पडल्यामुळे अनेक ठिकाणी बिघाड होऊन वीज पुरवठा खंडित झाला होता काही तासांच्या दुरुस्तीनंतर वीज पुरवठा सुरळीत करण्यात प्रशासनाला यश आले.

#########

**नागपूर** पोलिस दलामधील चार पोलिस कर्मचा-यांचा आज कोरोनामुळे मृत्यु झाला आहे. पोलीस नाईक सुरकर, सक्करदरा पोलीस ठाणे, महिला पोलीस हवालदार वत्सला मसराम पोलीस मुख्यालय, सहाय्यक फौजदार मडावी पोलीस ठाणे, गणेश पेठ आणि सुनिल सेलोकर, सहायक फौजदार अशी या पोलिस कर्मचा-यांची नावे आहेत. दरम्यान नागपूर जिल्ह्यात कोरोना बाधितांची संख्या 36 हजार 518 झाली असून 24 हजार 121 जण या आजारातून बरे झाले आहेत. दरम्यान नागपुर महानगरपालिकेने शरातील 31 खाजगी रुग्णालय शासनाच्या त्रीस्तरीय रचणेप्रमाणे डेडीकेटेड कोविड हॉस्पिटल म्हणून घोषित केले आहे. कोरोनामुळे काल **बुलडाणा** जिल्ह्यात चार जणांचा मृत्यू झाला असून एकूण मृत्यू पावलेल्यांची संख्या ५३ झाली आहे. दुसरीकचडे ९१ रुग्ण पॉझिटिव्ह आढळून आल्याने बाधितांचा आकडा ३,६०५ झाला आहे. सध्या जिल्ह्यात ९८० रुग्णांवर उपचार सुरू आहेत. संत गाडगेबाबा **अमरावती** विद्यापीठाच्या अहवालानुसार जिल्ह्यात आणखी 71 रुग्ण आढळल्याची माहिती जिल्हा शल्य चिकित्सक कार्यालयाने दिली असून कोरोना बाधित रुग्णांची संख्या 6 हजार 580 झाली आहे. **भंडारा** जिल्ह्यात आज 30 कोरोनाबाधित रुग्ण बरे होऊन घरी गेले असून 138 नव्या रुग्णांची भर पडली आहे. पॉझिटिव्ह रुग्ण संख्या 1884 झाली आहे.

#########

कोरोना रुग्णांची वाढती संख्या लक्षात घेता नागपुरात पुन्हा नव्याने ३१ नियमित रुग्णालये आता डेडिकेटेड कोव्हिड हॉस्पीटलमध्ये परीवर्तीत होणार आहे. यासंदर्भातील एक आदेश नागपूर महानगरपालिकेने निर्गमित केला असून २४ तासांत संबंधित रुग्णालयांकडून सदर रुग्णालय कोव्हिड रुग्ण दाखल करून सज्ज असल्याबाबतचा अहवाल मागविला आहे. आता

डीसीएच रुग्णालयांची संख्या एकुण ६२ झाली आहे. या आदेशात नमूद केल्यानुसार, २४ तासात रुग्णालयांकडून अहवाल प्राप्त झाल्यानंतर पुढील ४८ तासात कोव्हिड-१९ पॉझिटिव्ह रुग्ण संबंधित रुग्णालयांना भरती करता येतील. जे रुग्ण दाखल होतील त्यांच्यावर शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार उपचार करण्यात यावा, असेही आदेशात नमूद आहे. दाखल करण्यात आलेल्या रुग्णांचा रिअल टाईम अहवाल मनपाच्या पोर्टलवर नियमित अद्यावत करणे अनिवार्य राहील. जी रुग्णालये आता पूर्णत: कोव्हिड रुग्णालय होणार आहेत, त्यांची नावे महानगरपालिकेच्या संकेत स्थळावर उपलब्ध आहेत.

########

The End